**सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत सुधारित धान्य वितरण पद्धतीनुसार, अन्नधान्य वाहतूक निविदा प्रक्रियेमध्ये आधारभूत दरापेक्षा जास्त दराच्या निविदा मंजूरीचे अधिकार प्रशासनिक विभागाकडे घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : कंत्राट-१११५/ प्र.क्र. ९/ ना.पु. १६ अ,**

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १२ फेब्रुवारी, २०१५.

वाचा : (१) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. शिवाप-१०१०/प्र.क्र.१९८/ ना.पु.२८, दि. २३ फेब्रुवारी, २०१२.

(२) शासन शुध्दीपत्र, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. शिवाप-१०१०/ प्र.क्र. १९८/ ना.पु.२८, दि. १० एप्रिल, २०१२

(३) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र. कंत्राट-१०१२/प्र.क्र.६०/ ना.पु.१६अ, दि. २६ नोव्हेंबर, २०१२.

प्रस्तावना :-

दि.०२ जानेवारी, २०१२ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत पारित झालेल्या निर्णयानुसार, सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत सुधारीत वितरण पध्दती राबविण्याबाबत शासनाने दिनांक २३ फेब्रुवारी, २०१२ रोजी निर्णय घेतला आहे. त्यानुसार भारतीय अन्न महामंडळ ते शासकीय गोदाम व शासकीय गोदाम ते रास्त भाव दुकानापर्यंत अन्नधान्य वाहतूक, खुल्या निविदा प्रक्रियेव्दारे जिल्हास्तरावर नियुक्त करण्यात येणाऱ्या वाहतूक कंत्राटदारामार्फत करण्यात येते. जिल्हानिहाय अन्नधान्य वाहतूक कंत्राटदार नियुक्तीबाबत शासन निर्णय २६.११.२०१२ नुसार निविदा प्रक्रीया राबविण्यात येत आहे.

संदर्भाधीन शासन निर्णय दि. २३ फेब्रुवारी २०१२ व दि.१० एप्रिल, २०१२ रोजीच्या शासन शुद्धीपत्रकाअन्वये वाहतूक कंत्राट निविदा प्रक्रियेतील दर, आधारभूत दरापेक्षा जास्त प्राप्त झाल्यास निविदा मंजूरीचे अधिकार शासनस्तरावर मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या उच्चाधिकार समितीस आहेत.

द्वारपोच योजना कार्यान्वित करण्यासाठी, अन्नधान्याचा पुरवठा सुरळीत राहण्यासाठी, निर्णय प्रक्रियेतील कालापव्यय टाळण्यासाठी निविदेअंती आधारभूत दरापेक्षा अधिकचे दर आल्यास दर निश्चितीचे अधिकार उच्चाधिकार समिती ऐवजी प्रशासनिक विभागास प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत जिल्हानिहाय अन्नधान्य वाहतूकीचे कंत्राट निश्चित करण्यासाठी निविदेअंती आधारभूत दरापेक्षा अधिक दराच्या निविदा प्राप्त झाल्यास अशा निविदांवर निर्णय घेण्याचे अधिकार दि. २३ फेब्रुवारी, २०१२ व १० एप्रिल, २०१२ रोजीच्या शासन निर्णय / शासन शुध्दीपत्रानुसार गठीत केलेल्या उच्चाधिकार समितीऐवजी प्रशासनिक विभागास राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०२१२११४२०९४६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2015.02.12 11:51:48 +05'30'

(स. श्री. सुपे)

उप सचिव

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री
४) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
६) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
८) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
९) सर्व विभागीय आयुक्त / उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त कार्यालय
१०) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी
११) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१२) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१३) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१४) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१६) निवड नस्ती/नापु-१६अ.